**महाराष्ट्र शासन**

क्रमांक: बीयुडी-१६२४/प्र.क्र.९१/विमान-२
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २६ जुलै, २०२४.

**विषय :-राज्यातील विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी लेखाशिर्ष (३०५३ ०१४६) खाली महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस निधी वितरीत करणेबाबत.**

**वाचा** :- १. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.

२.वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.

३. अपर जिल्हाधिकारी, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र.मविविकं/२०१५/प्र.क्र.१९९/भूस/पुर्न, दि.२१.६.२०२४

**शासन ज्ञापन** :-

राज्यातील विमानतळ / धावपट्ट्यांच्या विकासासाठी लेखाशीर्ष ३०५३ ०१४६ खाली निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी राज्यातील विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी लेखाशीर्ष ३०५३ ०१४६ खाली रु.३०.०० कोटी (रू.तीस कोटी फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. वित्त विभागाने मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीमधून राज्यातील विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी लेखाशीर्ष ३०५३ ०१४६ खाली रु.९.०० कोटी (रुपये नऊ कोटी फ़क्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बिम्स प्रणाली) वितरीत केला आहे. सदर रू.९.०० कोटी (रू. नऊ कोटी फक्त) इतका निधी राज्यातील विमानतळ / धावपट्ट्याचा विकास / व्यवस्थापन / परिरक्षण या बाबींकरीता खालील तक्त्यातील स्तंभ क्र. २ मधील लेखाशीर्षाखाली स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीला वितरीत करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

(रूपये कोटीत)

| बाब | लेखाशिर्ष | सन २०२४-२५ ची अर्थसंकल्पिय तरतूद | या शासन ज्ञापनान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|
| **१** | **२** | ३ | **४** |
| राज्यातील विमानतळ/ धावपट्ट्यांच्या /विकास व्यवस्थापन/ परिरक्षण | ३०५३ ०१४६ | रु.३०.०० | **रु.९.००** |

२. उपरोक्त खर्च "मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १०२ विमानक्षेत्र, (००) (०१) विमानतळ/ धावपट्ट्या यांचा विकास (कार्यक्रम) (३०५३ ०१४६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या अर्थिक वर्षाकरिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. बिम्स प्रणालीवर निधी वितरणासाठी A००३६ सह सचिव / उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (विमानचालन), मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात आले आहे. सबब, सदर निधी बिम्स प्रणालीवर सह सचिव/उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (विमानचालन), मंत्रालय, मुंबई यांना वितरीत करण्यात यावा. संचालनालय स्तरावर देयके अदा करण्यासाठी उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो दि.३१ मार्च २०२५ पूर्वी खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करावी व खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तसेच, महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

५. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला निधी कोषागारातून आहरीत करण्यापूर्वी तसेच, खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतुदी तसेच, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०२४ व शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ मधील मार्गदर्शक सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.अनौस ४२३/व्यय-४,दि.२३.७.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. २०२४०७२६१७४८४५४१०७ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SHILPA ABHAY CHACHAD

Digitally signed by SHILPA ABHAY CHACHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=3f0b1454eadcb46569c38e868a5b441a8a32b442036ce5c8ffbed5e862cc4202,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=15FE38A4E995535864D6D7BC4CB39F75BB8A6906B9DA526DCB4921B96EE9B6EF, cn=SHILPA ABHAY CHACHAD
Date: 2024.07.29 11:44:50 +05'30'

**( शिल्पा चाचड )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
३. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
४. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-१४४३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, कार्या-व्यय ४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवड नस्ती.